# मजेशीर खेळणी

# बनवूयात



लेखक: रॉबर्ट लॉपशायर

मराठी अनुवाद: तृप्ती कर्णिक



# मजेशीर खेळणी बनवूयात



# झम झम फिडल



1. एक मोठा कार्डबोर्डचा बॉक्स आणि मजबूत दोरा घ्या.



2. बॉक्सला खाली एक छिद्र पाडा.



3. दोऱ्याच्या टोकाला एक गाठ बांधा आणि दोरा छिद्रातून आत घाला.



4. दोरा झाडूच्या काठीला बांधा.



5. झाडूला अशा प्रकारे पकडा ....



.....आणि जोशात वाजवा!

# कागदी कंदील



1. एक आयताकृती कागद आणि कात्री घ्या.



2. कागदाची मधोमध घडी घाला.



3. चित्रात दाखवलं आहे तसा कागद कापा.



4. कागद उघडा. दोन बाजू जुळवून गोल करा आणि चिकटवून टाका.

.



5. छोट्या कागदाच्या पट्टीचे हँडल बनवा. ते कंदिलावर चिकटवा.



खूप सारे कागदी कंदील बनवून घर छान सजवा.

# गरगर बटण



1. एक मोठ्या आकाराचं बटण घ्या.



2. लांब दोरा घ्या



3. बटणाच्या भोकातून दोरा घाला.



4. दोऱ्याला घट्ट गाठ बांधा.



5. दोऱ्याच्या दोन टोकांना पकडा आणि गोल गोल गरगर फिरवा.



6. दोरी दोन्ही बाजूने खेचा आणि सोडून द्या. परत खेचा आणि सोडा.





पुन्हा पुन्हा गरगर फिरवा, खेचा आणि सोडून द्या.

बटण गोल गोल गरगर फिरत राहील.

# रूम फ्रेशनर



1. आईकडून एक संत्रं,
एक टूथपिक आणि
काही लवंगा घ्या.





2. संत्र्यामध्ये टूथपिकने
डोळे, नाक आणि
चेहऱ्याच्या आकाराची
छिद्र पाडा.



3. पाडलेल्या भोकांमध्ये
लवंगा चिकटवा.





4. आता केसांसाठी खूप
सारी छिद्र पाडा.



5. त्या सगळ्या
भोकांमध्ये लवंगा
चिकटवा.





तुमच्या खोलीत ह्याला लटकवा. खोलीभर
मस्त वास पसरेल.

# भिरभिर चक्री



1. छोटा चौकोनी कागद, एक मणी, टाचणी, कात्री आणि छोटी काठी घ्या.



2. चित्रात दाखवल्याप्रमाणे कागदाच्या चारही कडांना कापा.



3. कागदाची चार टोकं दाखवल्याप्रमाणे खेचा.



4. बाजूच्या चित्रासारखं कागदामध्ये टाचणी टोचा.



5. टाचणीवर मणी घाला.



6. टाचणीला जोर देऊन काठीत घुसवा.



7. आता काठीला धरून जोरात पळा.

कागदाची चक्री जोरात गोलगोल भिरभिरेल.

# पार्टीसाठी बस्कर



1. दोन रंगीत कागद आणि कात्री घ्या



2. मधोमध फोल्ड करा आणि दाखवलं आहे तसा कागद कापा.



3. दुसऱ्या कागदाच्या समान आकाराच्या पट्ट्या कापा. .



4. पहिला कागद जमिनीवर ठेवा आणि त्यात चित्रात दाखवली आहे तशी पट्टी घाला.



5. सगळ्या पट्ट्या त्याप्रमाणे घाला



अशी भरपूर बस्कर तयार करून दोस्तांना पार्टीसाठी बोलवा.

# घरात जंगल उगवा



1. आईकडून एक रताळं घ्या.



2. चार टूथपिक आणि ग्लासभर पाणी घ्या.



3. रताळ्याला ह्या प्रकारे टूथपिक टोचा.



4. रताळ्याला ग्लासात असं ठेवा.



5. रताळ्याला ओलंच ठेवा म्हणजे तुमचं जंगल भराभर वाढेल.



जंगलातल्या प्राण्यांपासून काळजी घ्या बरं.

# हेलिकॉप्टर



1. लाकडी बुच(कॉर्क), टूथपिक आणि जाड कार्ड पेपर घ्या



2.चित्रात दिसतो आहे तसा पेपर कापा.



3. ह्याप्रकारे कागद दुमडा.



4. कागदाला टूथपिक चिटकवा.



5. नंतर लाकडी बुचात टूथपिक टोचा.



6.आता बाहेर जाऊन हेलिकॉप्टरला हवेत गिरक्या घेऊ द्या.





# फटाक फटाका





1. एक कागद घ्या.

2. कागदाची लांब पट्टी कापा.





3. पेपर दुमडून दाखवला आहे तसा कापा



4. चित्रात दाखवला आहे तसा पेपर पुन्हा दुमडा.



5. पट्टी तोंडात धरा.



6. आता जोरात हवा फुंका



मित्रांना बोलावण्यासाठी हा फटाका वापरायला मजा येईल.

# बोलणारा कुत्रा



1. मध्यम आकाराची पेपर बॅग घ्या.



2. रंगीत खडू घ्या.



3. कुत्र्याचा चेहरा काढा.



4. खाली तोंड काढा.



5. रंगीत कागदाचे दोन कान कापा.



6. रंगीत कान चिटकवा.



7. बॅगेत हात घाला, बोटाने हलवत राहा आणि कुत्र्याशी मस्त गप्पा मारा.



ह्या नव्या मित्राशी मनसोक्त गप्पा मारू शकता.



# बटाट्याचे ठसेकाम

1. आईकडून एक बटाटा, ताटली, कागद आणि रंग घ्या




2. बटाट्याचे दोन तुकडे करा



3. चित्रात दाखवलं आहे तसा बटाटा कापा



4. ताटलीत रंग टाका आणि बटाटा त्या रंगात बुडवा.




5. बतात कागदावर दाबून सुंदर ठसेकाम करा.




आता ह्या कागदापासून काय गंमत बनवता येईल हे चला तर पुढच्या पानावर पाहूयात.

# भेटवस्तू..खास बाबांसाठी



1. ठसेकाम केलेला कागद आणि डबा.



2. डब्याच्या आकाराचा कागद कापा.



3. कागद डब्यावर चिकटवा.



4. कागदावर डब्याचं झाकण ठेऊन गोल करा.



5. गोलाचा आकार नीट कापा.



6. तो कागद झाकणाला चिकटवा.



बाबांना हा सुंदर डबा खूप आवडेल. पैसे ठेवण्यासाठी त्यांना वापरता येईल.

# खेळण्यातला टेलिफोन



1. दोन पेपर ग्लास घ्या.



2. ... आणि एक लांब दोरी घ्या,



3. दोन्ही ग्लासना मधोमध छोटं छिद्र पाडा.



4. छिद्रातून दोरा घाला.



5. धाग्याच्या टोकाला गोंद लावून दोन्ही ग्लासाच्या टोकाला चिकटवा.



6. दोरा ताणून धरा आणि ग्लासच्या माईकमधून बोला.



आपल्या लाडक्या कुत्र्याबरोबर हा फोन वापरून भरपूर गप्पा मारू शकता.

# कोलाज



1. कार्ड बोर्ड, कात्री
आणि रंगीबेरंगी कागद.



2. कागदाचे तुकडे कापा.



3. तुकडे कसेही कार्ड
बोर्डवर चिकटवा.



4. भरपूर कागद
एकमेकांवर
कसेही चिकटवा.



हे सुंदर चित्र आई
दिवाणखान्यात नक्की
लावेल. तिच्यासाठी पण
अजून एक चित्र बनवाल
ना?



# उड्या मारणारा विली



1. कागद आणि कात्री घ्या.



2. कागदाचा मोठा तुकडा कापून विलीचा चेहरा काढा. .



3. कागदाला टेबलावर दाबून अर्धगोल आकार द्या.



4. विलीला हलकासा ओला करा.



5. टेबलावर ठेऊन त्याच्या शेपटीला हलकीशी फुंकर मारा.





जास्त विली बनवून त्यांची शर्यत लावता येईल.

# फुलपाखराची क्लीप



1. कपड्याची क्लीप, कात्री, रंगीत पेन्सील, दोन फलक टाचण्या



2. कापडाच्या क्लीपला दोन्ही बाजूनी फलक टाचणी लावा.



3. कागदाचे छोटे छोटे पाय कापा आणि क्लीपला चिकटवा.



4. कागदाचा पंख आणि शेपटीचा आकार कापा. त्यावर रंगीबेरंगी सुंदर चांदण्या काढा.



5. पंख आणि शेपटी क्लीपवर चिकटवा.





6. क्लीपला दाबून फुलपाखराचे तोंड उघडा....

... आणि हवे तिकडे त्या फुलपाखराला बसवा.

# झिरमिळ्याची टोपी



1. एक पेपर कप, दोरा आणि काही स्ट्रॉ



2. स्ट्रॉ एकत्र करून दोरीवर ठेवा.



3. स्ट्रॉचा गठ्ठा मधोमध बांधा.



4. पेपर कपला मधोमध छिद्र पाडा.



5. छिद्रातून दोरी घाला.



6. गळ्याला दोरी बांधा म्हणजे टोपी डोक्यावर छान बसेल.



मोत्या तुमच्या रुबाबदार व्यक्तिमत्वाने एकदम भारावून जाईल!

# स्केटींग



1. एक मोठा रबर-बँड, सुताचे मोठे रिकामे रीळ, साबण
आणि दोन टूथपिक.



2. रिळाच्या दोन्ही बाजूला साबण घासा.





3. रिळाच्या भोकातून रबर बँड घाला.



4. रबर बँडमध्ये टूथपिक्स घाला.



5. रीळ हाताने\ गोल गोल फिरवून बघा ..



6. ....बागेमध्ये स्केटिंगची मजा घ्या..





# नाचणारा जोकर



1. कात्री, मोठा कागद आणि रंगीत खडू



2. कागदावर विदुषकाचा आकार काढा आणि तो कापा.



3. त्याला छान रंगीबेरंगी रंगवा.



4. पायासाठी दोन गोल कापा.



5. बोटांनी त्याला नाचवा किंवा पळवा.



अजून असे जोकर मित्र बनवायला कसली मजा येईल नं.

# जलतरंग



1. घरातले चार जुने काचेचे गलास आणि एक लाकडी चमचा.



2. एका ग्लासात दाखवलं आहे तितकं पाणी घ्या.



3. दुसऱ्या ग्लासात अजून थोडं जास्त पाणी घ्या.



4. तिसऱ्या ग्लासात आधीच्या ग्लासापेक्षा जास्त पाणी घ्या.



5. शेवटच्या ग्लासात ग्लास जवळपास भरेल इतकं पाणी घ्या.



6. चित्रात दाखवलं आहे तसे ग्लास ओळीत मांडा.

7. चमच्याने हळुवार वाजवा.



8. रेडियो किंवा टी.व्ही.च्या धूनवर संगीत द्या.

# लिंक चेन



1. थोडे कागद, कात्री आणि गोंद.



2. कागदाच्या पट्ट्या कापा.





3. पट्टीची दोन टोकं चिकटवा.



4. त्या गोलामध्ये आता एक पट्टी घाला



5. त्या पट्टीचीही दोन्ही टोकं चिकटवा,



6. अशा प्रकारे गोल एकात एक अडकवून लांब चेन तयार करा.



मोत्याच्या गळ्यात ही रंगीबेरंगी चेन अडकवून त्याला टेकडीवर फिरायला न्या.



# बटूकला ससुला



1. एक छोटा बटाटा, कागद, कात्री, गोंद, पेपर कप आणि तीन ड्राइंग पिना (टाचण्या)



2. दोन मोठे पाय आणि दोन कान कापा. दोन्ही कानाला दुथपिक गोंदाने चिकटवा.



3. बटाट्यामध्ये टूथपिक टोचा.



4. आता बटाट्याची टूथपिक कपामध्ये टोचा. कपाला खाली पाय चिकटवा.



5. मिशा म्हणून बटाट्याला टूथपिक्स टोचा.



6. टाचणी दाबून डोळे व नाक काढा. मग कान चिकटवून टाका.



ससुल्याबरोबर खेळायला अजून एक धिटुकली ससुली बनवूयात.

# खेळण्यातला बगीचा



1. एका खोलगट थाळी आणि छोटे रंगीबीरंगी दगड.



2. दोन कोवळी' गाजर मस्त फस्त करा आणि त्याचा फक्त शेंडा ठेवा.



3. ताटलीत दगड ठेऊन त्यात थोडे पाणी घाला.



4. गाजराचे दांडे बशीत ठेवा.



5. अजून थोडे पाणी घाला.







गाजराचे कोब हळू हळू वाढून त्याची छोटी झाडे तयार होतील.

# गर्र गर्र भिंगरी



1. एक कागद, एक ग्लास , पेन्सील, कात्री, क्रेयॉन आणि एक टूथपिक.



2. कागदावर ग्लास ठेऊन पेन्सिलीने गोल काढा.



3. गोल आकार कापा आणि पेन्सिलीने त्यावर गोल गोल वर्तुळे काढा.



4. कागदाच्या मध्यबिंदूमध्ये टूथपिक आरपार घुसवा.



5. आणि टेबलावर किंवा फरशीवर गर्र गर्र फिरवा.



# पॅराशूट



1. एक पेपर नॅपकीन, दोरा आणि कपड्याची क्लीप.



2. प्रत्येक दोरा दोन फुट असे चार दोरे कापा.



3. चारही दोरे पेपर नॅपकीनच्या चार कडांना बांधा.



4. नंतर चारही दोरे एकत्र गाठ मारून त्याला कपड्याची क्लीप लावा.



5. पेपर सरळ अंथरून गोल रोल करा.



आणि मैदानात जाऊन उंच उडवा.



# दोन शिंगांचा जोकर



1. एक छोटी पेपर बॅग,
क्रेयॉन आणि कात्री.



2. बॅगेवर विदुषकाचा विनोदी चेहरा
काढा.



3. बॅगेच्या वरच्या
बाजूला दोन भोकं
आणि नाकाच्या
जागेवर एक भोक
पाडा.



4. भोकांमध्ये बोटं
घाला.



5. आता शिंगं आणि
नाक फिरवून
मोत्याशी मस्ती करा.



# हवेने फिरणारं चक्र



1. चार पेपर कप, कार्डबोर्डचा एक तुकड़ा, गोंद, एक मोती, एक टाचणी आणि एक काठी.



2. चित्रात दाखवलं आहे तश्या कार्डबोर्डवर रेषा मारा.



3. कार्डबोर्डच्या चारही टोकांना पेपर कप चिकटवा.



4. कार्डबोर्डवर दोन्ही रेषा छेदतात तिकडे एक बारीक भोक करून टाचणी अडकवा.



5. टाचणीला वर मोती लावा आणि खालून टाचणी काठीत घुसवा.



बाहेर जोराची हवा असेल तर हे चक्र जोरात गोल गोल फिरेल!

# पक्ष्यांचे खाऊघर



1. एक टेट्रापैक चा
रिकामा खोका,
कात्री, दोरा आणि
तार.





2. बॉक्सची एक
बाजू चित्रात
दाखवली आहे तशी
कापा.



3. वरती एक बारीक
भोक करा.



4. त्या भोकातून दोरी
घाला.



5. बॉक्समध्ये पक्ष्यांना
आवडेल असा पोळीचे तुकडे
किंवा इतर खाऊ घाला.



6. आणि तो
बॉक्स झाडाला
तारेने लटकवा.



पक्षी गाणी म्हणत मजेत हा खाऊ
फस्त करतील!

# मस्त मास्क



1. मोठी पेपर बॅग, कात्री, रंगीत कागद, पेपर कप, गोंद.



2. बॅगेवर एक गमतीदार चेहरा काढा आणि डोळ्या जागी छोटे गोल कापा.



3. नाक म्हणून पेपर कप चिकटवा.



4. कागदाचे केस कापा आणि चिकटवा.



5. काळ्या कागदाचा चष्मा बनवा आणि डोळ्याला चिकटवा.



6. आपल्या चेहऱ्यावर हा मस्त मास्क घाला.



आणि मित्रांची गंमत करा!



**समाप्त**